नैसर्गिक आपत्तीत मृत पावलेल्या मच्छिमारांच्या वारसांना अनुदान सन २०१५-१६ या वर्षातील तरतूद वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि -१११५/प्र.क्र.१३१/पदुम-१४,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.**
**तारीखः २६ जून, २०१५**

वाचा -

आयुक्त (मत्स्य) यांचे क्र.मत्स्य/सा/०७२२०१/६/२०१५, दिनांक १६.०५.२०१५ चे पत्र

**प्रस्तावना :-**

मच्छिमार मासेमारी करत असताना मृत/ बेपत्ता झाल्यास त्यांच्या वारसाना रु. १,००,०००/- अर्थसहाय्य देण्यात येते. सन २०१५-१६ या वर्षात सदर योजनेसाठी अर्थसंकल्पीत असलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मच्छिमार मासेमारी करत असताना मृत/ बेपत्ता झाल्यास " नैसर्गिक आपत्तीत मृत पावलेल्या मच्छिमारांच्या वारसांना सहायक अनुदान " या योजनेअंतर्गत सन २०१५-१६ या वर्षातील रु. १७,५०,०००/- (अक्षरी रुपये सतरा लाख पन्नास हजार मात्र ) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदरहू रक्कम कोषागारातून काढण्यासाठी प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे व यासाठी आयुक्त, मत्स्यव्यवसाय हे नियंत्रक अधिकारी म्हणून राहतील.

३. वरील खर्च हा "मागणी क्रमांक डी-६, २४०५-मत्स्यव्यवसाय, (००) १०३, सागरी मत्स्यव्यवसाय, (०१) योजनेत्तर अनुदाने, (०१) (०४) नैसर्गिक आपत्तीमुळे बाधा पोहचलेल्या मच्छिमारांना सानुग्रह अनुदान (योजनेत्तर ) (२४०५ १२८७ ) ३१-सहाय्यक अनुदाने ( वेतनेत्तर )" या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र. ८५/ अर्थ-३, दिनांक १७.४.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२६१७०६३४९००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nitin Madhavrao Pawar

Digitally signed by Nitin Madhavrao Pawar
DN: CN = Nitin Madhavrao Pawar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.06.26 17:08:00 +05'30'

**नितीन पवार**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) प्रादेशिक उपआयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
३) सर्व सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय
४) महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ मजला,
७) मंत्रालयासमोर, मुंबई
८) वित्त विभाग ( व्यय-२/ अर्थसंकल्प-१५/ अर्थसंकल्प-३ ) मंत्रालय, मुंबई

**प्रत माहितीकरिता**

१) मा. मंत्री ( पदुम ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री ( मत्स्यव्यवसाय ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सचिव, पदुम यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४) कक्ष अधिकारी ( पदुम-१६ ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५) निवड नस्ती, पदुम-१४